**एकत्रित परिपत्रक:-**
**रास्तभाव/शिधावाटप दुकानामध्ये लावावयाच्या सूचना फलकाबाबत तसेच, रास्तभाव/ शिधावाटप दुकाने उघडी ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र. ३२२/नापु-३१**
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०९ मार्च, २०२०.

वाचा :

१. शासन परिपत्रक, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र.- साविव्य- १००२/ ३८४/ प्र.क्र.९००/नापु २८, दि. २१.०२.२००२.
२. शासन परिपत्रक, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र.- संकीर्ण-२०१९/४२७/ प्र.क्र. ११४/नापु ३१, दि. ११.०४.२०१९.
३. शासन परिपत्रक, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र.- विसआ-१३१९/८८९/ प्र.क्र. १६१/नापु ३१, दि. १३.०६.२०१९.

**-:शासन परिपत्रक:-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत वितरीत होणाऱ्या विविध ग्राहकोपयोगी वस्तूंना जनतेमध्ये विहित वेळेत वाटप करणे गरजेचे असताना देखील रास्तभाव/शिधावाटप दुकानांकडून सदर ग्राहकोपयोगी वस्तुंचे वेळेवर, नियमीत आणि दररोज वाटप होत नसल्याची तक्रार राज्यातील जनतेकडून शासनास बऱ्याच प्रमाणात प्राप्त होत आहे. हे टाळण्यासाठी शासनाकडून रास्तभाव/शिधावाटप दुकाने यांना वेळोवेळी परिपत्रके निर्गमित करुन आवश्यक त्या सूचना देण्यात आल्या आहेत.

या परिपत्रकाद्वारे राज्यातील जनतेला विहित कालावधीत/मर्यादेत ग्राहकोपयोगी वस्तु मिळण्याकरीता आणि रास्तभाव/शिधावाटप दुकानांना देण्यात येणाऱ्या आवश्यकत्या सूचनांची लोकहितास्तव एकत्रित माहिती खालीलप्रमाणे नमूद करण्यात येत आहे.

**राज्यातील जनतेच्या कल्याणासाठी रास्तभाव/शिधावाटप दुकानांबाबत शासनाकडून देण्यात येणाऱ्या सूचना.**

**शासन परिपत्रक, अ.ना.पु.व ग्रा.सं. वि. क्र.- साविव्य- १००२/३८४/प्र.क्र.९००/नापु २८, दि.२१.०२.२००२.**

i. रास्तभाव/शिधावाटप दुकानांकडून राज्यातील जनतेला ग्राहकोपयोगी वस्तुंचे वाटप सुस्थितीत होण्याकरीता, रास्तभाव/शिधावाटप दुकाने सकाळी ४ तास व दुपारी ४ तास निश्चितपणे उघडी ठेवण्यात यावी. स्थानिक परिस्थितीनुसार याबाबतच्या नेमका वेळा अप्पर जिल्हाधिकाऱ्यांनी/नियंत्रक शिधावाटप, मुंबई यांनी निश्चित कराव्यात.
ii. ज्या ठिकाणी आठवडी बाजार भरत असेल अशा ठिकाणी आठवडी बाजाराच्या दिवशी रास्तभाव दुकाने पूर्ण वेळ उघडी ठेवण्यात यावीत.
iii. विविध कारखाने/उद्योगधंदे असलेल्या क्षेत्रात त्यांच्या साप्ताहिक सुट्टीच्या दिवशी रास्तभाव/शिधावाटप दुकाने पूर्णवेळ उघडी ठेवण्यात यावीत.

**शासन परिपत्रक, अ.ना.पु.व ग्रा.सं. वि. क्र.- संकीर्ण- २०१९/४२७/प्र.क्र.११४/नापु ३१, दि.११.०४.२०१९.**

संसदीय लोकलेखा समितीने केलेल्या सूचना आणि नियंत्रण आदेश, २०१५ च्या कलम १० मध्ये नमूद केल्याप्रमाणे राज्यातील सर्व रास्तभाव दुकानदारांनी खालील बाबी नमूद असलेली सूचना फलक लावणे आवश्यक राहील.

I. लक्ष्य निर्धारीत लाभार्थ्यांना वितरीत करण्यात येणाऱ्या अन्नधान्याचे प्रमाण.
II. किरकोळ विक्रीचे मूल्य.
III. अन्नधान्याची पात्रता.
IV. रास्तभाव दुकाने उघडणे व बंद करण्याची वेळ.
V. भोजनाची वेळ.
VI. अन्नधान्याचा दर्जा आणि प्रमाण.
VII. काही तक्रार असल्यास त्या कोणत्या अधिकाऱ्याकडे कराव्यात याबाबतची माहिती.
VIII. तक्रार करण्यासाठी टोल फ्री क्रमांक, हेल्पलाईन क्रमांक इत्यादी.

**शासन परिपत्रक, अ.ना.पु.व ग्रा.सं. वि. क्र.- विसआ- १३१९/८८९/प्र.क्र.१६१/नापु ३१, दि.१३.०६.२०१९.**

महिन्याच्या कोणत्याही दिवशी म्हणजेच महिन्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत लाभधारक रेशन दुकानामध्ये रेशन घेण्यास आल्यास त्याला दुकानदाराने धान्य उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील, असे न केल्यास त्या दुकानदारावर नियमानुसार कारवाई करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहे.

२. वरील रकान्यात नमूद केलेल्या सूचना फलक सर्व रास्तभाव दुकानदारांने लावले आहेत किंवा नाही याबाबत जिल्हा पुरवठा अधिकारी व नियंत्रक, शिधावाटप यांनी खात्री करावी व त्याचा अहवाल एक महिन्याच्या आत शासनास सादर करावा.

३. उपरोक्त परिपत्रकाच्या अनुषंगाने यापूर्वीचे दि. २१.०२.२००२, दि. ११.०४.२०१९ आणि दि. १३.०६.२०१९ चे शासन परिपत्रक अधिक्रमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००३०९१५००३९२५०६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food, Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b, serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2020.03.09 15:04:26 +05'30'

**(प्र. गि. चव्हाण)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.राज्यपाल यांचे सचिव,
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

५. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६. मा. मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
७. मा. राज्यमंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
८. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
९. मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई-३२
१०. मा. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
११. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१२. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील सर्व सह सचिव,उप सचिव , अवर सचिव, कक्ष अधिकारी.
१३. सर्व प्रशासकीय विभाग प्रमुख, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उपसंचालक पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१५. उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा)परळ, मुंबई.
१६. महालेखापाल (लेखा/ अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१,मुंबई.
१७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचे कार्यालय , मुंबई.
१८. महासंचालक, माहिती जनसंपर्क , मंत्रालय, मुंबई
१९. महासंचालक, यशवंतराव चव्हाण प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे.
२०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन , मुंबई. (१०प्रती)
२१. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
२२. अध्यक्ष, ऑल महाराष्ट्र फेअर प्राईज शॉपकिपर्स फेडरेशन, पुणे, व्दारा गुप्ता जनरल स्टोअर्स, अन्सारी काट्यासमोर, काळभोर नगर, चिंचवड, पुणे ४११ ०१९.
२३. अध्यक्ष, अखिल महाराष्ट्र राज्य स्वस्त धान्य दुकानदार, केरोसीन परवाना धारक महासंघ, साई भगित्रा निवास, एन-४ सिडको, ए.सी. प्लॉट नं.९, औरंगाबाद.
२४. अध्यक्ष, मुंबई रेशन दुकानदार संघटना, ओरिएन्टल हाऊस, ७ जे टाटा मार्ग, मुंबई.
२५. निवड नस्ती,कार्यासन ना.पु.३१.